# भारतीय न्याय दर्शन

कॉलेजच्या *Inter Arts* या दुसऱ्या वर्षाला *Western Logic* हा विषय मला फार प्रिय झाला होता. त्या वेळीं काळे हुल्याळकर यांचें टेक्टबुक—ज्याला सोनोपंत दांडेकरांची प्रस्तावना होती—तें तर मी बारकाईनें अभ्यासलेच पण याशिवाय वाडिया कॉलेजचे प्राचार्य वाडेकर यांची*Deduction* आणि *Induction* ही दोन्हीं पुस्तकें मला फार उपयोगीं पडली. तसेच दोन्हीं भाग एकत्र असलेलें ना. सी. फडके यांचें एकच मोठे पुस्तक—जें त्यांनी मनोरंजक पद्धतीनें आणि ललित भाषाशैलींत लिहिलेलें—त्याच्या वाचनामुळें मला तर्कशास्त्राची अधिकच गोडी लागली.

पाश्चिमात्य तर्कशास्त्रांतील अगदी आधुनिक विचार प्रवाह—ज्याला *Symbolic Logic* म्हटले जाते त्याच्याकडे मी संपूर्ण दुर्लक्ष केले.त्या काळांत एक गोष्ट मी प्रामुख्यानें केली कीं, या *Westarn Logic* मुळें भारतीय न्यायशास्त्राविषयीं माझ्या मनीं कुतुहल निर्माण झाले. पुणे विद्यापीठांतील ग्रंथालयांत मी यासाठीं १५ दिवस कमीतकमी ३ तास वेळ दिला. आणि न्यायशास्त्रावरील सर्व

वाङ्मय बारकाईनें पाहून घेतले. खूप मोठ्या नोट्स काढल्या. त्या जपून ठेवलेल्या नोट्सचा आतां मला उपयोग झाला. १९५८ नंतर मी तर्कशास्त्राला दुरेघी मारली आणि तत्त्वज्ञान या ज्ञानशाखेकडे वळलो. आतां मला 'वृत्तिप्रभाकर' अथवा धर्मराज अध्वरिन्द्रचा 'वेदान्त परिभाषा' असे ग्रंथ अवघड जात नाहीत. ५९/६० या काळांत माझ्या संग्रहीं 'भारतीय तत्त्वज्ञान' प्रा. श्रीनिवास दिक्षित, *Indian philosophy , Hindu view of life. by pro. Radhakrishan.* अशा स्वरूपाची कांहीं पुस्तकें होती. नंतरच्या काळांत तत्त्वज्ञान या विषयावरील तीनएकशें ग्रंथ—अत्यंत महत्वाचे आणि दुर्मिळ असलेले—मी जमा केले. त्यांच्या वाचन, चिंतन, मननांतून माझ्या तत्त्वज्ञान या विषयाला कमालीची पूर्णता प्राप्त झाली.

# सूत्र वाङ्मय

श्रुतिवाङ्मय स्फूर्तिप्रधान आहे. दर्शनें मननप्रधान आहेत. बौद्धिक आणि वैचारिक भूमिकेवरून श्रौत सिद्धांतांचें परीक्षण करणें हें दर्शनकारांचें ध्येय आहे. तत्त्वज्ञान म्हणजे अनुभवाची संगती लावणारे शास्त्र, प्रत्यक्ष अनुभव नव्हें. श्रुति हा प्रत्यक्ष अनुभव आहे. दर्शनें ही अनुभवाची मीमांसा आहे. *Science of Interpritention.* मीमांसेनेच दर्शन

वाङ्मयास इसवी सन पूर्व १५०० वर्षी प्रारंभ झाला. श्रुति हे मन्त्र वाङ्मय आहे. तर दर्शनें हे सूत्र वाङ्मय आहे. सूत्राची व्याख्या मध्वभाष्यांत अशी आहे,

अल्पाक्षरं असंदिग्धं सारवत् विश्वतोमुखम् ।
अस्तोभं अनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः ।।

स्तोभ याचा अर्थ भाष्यांत असा आहे,''अर्थशून्यो गानादिस्वरपरिपूरणार्थः शब्दविशेषः।''

सूत्रांत अर्थशून्य अशी एक मात्राहि आढळणार नाही. तरमग निरर्थक शब्द अथवा वाक्य याविषयीं बोलणेच नको. अल्पाक्षरत्व, सारग्रहण, असंदिग्धता, विश्वतोमुखत्व म्हणजे *Maltidiamentional* बहु आयामी, अस्तोभत्व म्हणजे निरर्थक शब्दांचा अभाव, अनवद्यत्व म्हणजे दोषराहित्य. '' सूत्रं सूत्रविदो विदुः।'' या सर्व गोष्टी असतील तर सूत्रा संबंधींचे जाणकार त्यालाच सूत्र असें म्हणतात.

या सूत्रांचा उपयोग पूर्वाचार्य टिप्पणीसारखा करीत. त्या आचार्यांना, त्यांच्या शिष्यांना, श्रोत्यांना जे अर्थ अभिप्रेत असतील तेच नंतरच्या टीकाकारांना उपलब्ध होणे अशक्य झाले. म्हणूनच बादरायणांच्या ब्रह्मसूत्रावर सहा विविध भाष्यें होऊं शकली. संदिग्धता हा दोष सूत्रवाङ्मयांत कालप्रवाहानें निक्षिप्त केला आहे. रचनाकालीं हीं

सूत्रें नि:संदिग्ध होती. किंवा असेहि म्हणता येईल कीं, ‘विश्वतोमुखत्व’ हा गुण ब्रह्मसूत्रांत असल्यामुळें सहाच काय सहस्रावधी भाष्यें झाली तरी ती सहाजीकच असून आवश्यकहि आहेत. विविध भाष्यें सूत्रांच्या संदिग्धतेमुळें निर्माण झाली नसून त्यांच्या सर्वस्पर्शित्वामुळें निर्माण झाली आहेत. विविधार्थवत्ता हा गुणविशेष आहे, दोषस्थल नव्हें.

दर्शन वाङ्मयाचा विकास शिष्यप्रशिष्यांच्या परंपरेनें सिद्ध झाला आहे. मूळ दर्शनावर एक भाष्य,नंतरच्या काळांत येणाऱ्या आक्षेपांच्या निरसना साठीं अथवा कालानुसार सुलभतेसाठीं दुसरें भाष्य त्यावर याच कारणांसाठीं तिसरें भाष्य असा दर्शनसूत्रांचा गंङ्गा प्रवाह अविच्छिन्नपणें वृद्धिंगत झाला आहे. भारतीय तत्त्वज्ञ विद्याविनीत होते. प्रत्येक भाष्यकार, टीकाकाराची प्रतिभा स्वयंभू व स्वयंप्रभ असे.पण आपल्या एवढ्या स्वतंत्र कृतीहि ते आपल्या परंपरेला आणि आद्य प्रणेत्याला निवेदन करून, पूर्वाचार्यांची बिरूदें मिरवीत असत. यासाठीं ते विद्याविनीत होते असे मी म्हटले.

स्वत: शङ्कराचार्य हे व्यासांचे भाष्यकार आहेत सुरेश्वर, मधुसूदन, प्रकाशानन्द हे भाष्यकारांचे भाष्य कार आहेत. या दर्शनभाष्यांची पावनी गंगा म्हणजे

स्वतंत्र, स्वयंप्रभ विचारांच्या अनिरूद्ध प्रवाहाचें एक हृदयंगम दृश्य आहे. एकेका टीकाकाराची योग्यता जवळ जवळ आद्य प्रणेत्याएवढीच आहे मात्र प्रत्येकाने आपल्या उर्जस्वल प्रतिभेच्या प्रभातरल ज्योतीची आरती त्या त्या आद्य प्रणेत्यापुढेच वितरली आहे.

दर्शन शब्द तत्त्वज्ञान, यथार्थज्ञान, दर्शनशास्त्र अशा विविध अर्थाने उपयोजिला जातो.

दर्शन म्हणजे नझारा, देखावा. दर्शन हें वस्तु निष्ठ असतें. त्याच प्रमाणे तें व्यक्तिनिष्ठहि असतें व्यक्तिनिष्ठेवर दर्शनानुभवांत अधिक भर असतो. *Every system of thought is perspective*. असे म्हटले जाते. आत्मकेंद्रातच परं सत्याचा अनुभव येत असतो. यामुळें तत्त्वज्ञानाला दर्शन ही संज्ञा अत्यन्त समर्पक आहे.

प्लेटो,स्पेन्सर,कान्ट यांच्या मतें अंतीम वस्तूचें म्हणजे सत्याचें मूलस्वरूप आपणास कधीच समजत नाही. प्लेटोची **Ideal World** कान्टची **Thing in Itself** आणि स्पेन्सरचे **Unknowable** या तिन्ही कल्पना अंतीम वस्तूचें खरें स्वरूप बुद्धीला कधीच समजत नाही, या सिद्धान्तावर अधिष्ठित आहेत. हा त्यांचा सिद्धान्त अन्तीम वस्तू विषयीं आहे. सामान्य पदार्थ ज्ञानाची चिकित्सा

त्यांनी सूक्ष्मपणें आणि शास्त्रीय दृष्टीनें केली नाही. त्यांच्या वरील सिद्धान्तास सामान्य ज्ञानाच्या पृथ:करणाचें अधिष्ठान नाही. प्रथम सर्वसामान्य वस्तु प्रतीतीचे परिपूर्ण पृथ:करण केले पाहिजे आणि नंतर उपलब्ध सिद्धान्ताच्या आधारावर अंतीम वस्तूविषयीं अनुमान केले पाहिजे. अशी यथानुक्रम चिकित्सा पाश्चिमात्य तत्त्वज्ञांनी केली नाही. ज्ञानाच्या यथार्थतेची प्रमाणे प्रथम निश्चित केली पाहिजेत तरच अंतीम वस्तूचें ज्ञान यथार्थ कीं अयथार्थ ह्याचा निर्णय घेता येईल. यथार्थ ज्ञानाची कसोटी—निकषच—आपणाजवळ नसेल तर भ्रम व प्रमा यांतील भेद कळणार कसा? भारतीय दर्शनकारांच्या या शास्त्रशुद्ध भूमिकेविषयीं मॅक्समूलर यांनी*Six system of Indian philosophy* या त्यांच्या ग्रंथात धन्योद्गार काढले आहेत.

*" Such an examination of the authorities of human knowledge, pramanas ought, of cours, to form the introduction of every system of philosophy and to have clearly seen this is, as it seems to me, a every high distinction of Indian philosophy. How much useless controversy would have been avoided particularly among Jewish, Mohammedan & Christian philosophers, if a*

*proper place had been assigned in limine to the question of what constitutes our legitimate or our only possible channels of knowledge, whether perception, inference, revelation or anything else! Supported by these inquiries into the evidences of truth, Hindu philosophers have built up their various systems to philosophy, or their conceptions of the world, telling us clearly what they take for granted, and then advancing step by step, from the foundations to the highest pinnacles of their systems''* मॅक्समूलरने भारतीय दर्शनकारांचे वैशिष्ठ्य वरील उताऱ्यांत विशद केले आहे. प्रमाणचर्चा हा प्रत्येक तत्त्वपद्धतीचा पायाच आहे. प्रत्यक्ष अनुमान, श्रुति इत्यादि ज्ञानसाधनांचे प्रत्यक्ष प्रामाण्य प्रथम परिक्षिलें पाहिजे. हिंदू तत्त्वज्ञांनी आपल्या तत्त्वज्ञानाचा सुवर्णमहाल शास्त्रपूत अधिष्ठानावर उभारला आहे.जगताच्या अत्यन्ता भावाची सिद्धि अनुपलब्धि प्रमाणानें करून दार्शनिकांनी ब्रह्मानुभूतीला बुद्धिप्राण्याचें अधिष्ठान दिले आहे. प्रमाण चिकित्सा करण्यांत अग्रपूजेचा मान न्याय दर्शनाचा आहे. न्याय दर्शनांत पद्धतीचें फार महत्व आहे. सिद्धान्त कोणता आहे या

प्रश्नापेक्षां सिद्धान्ताची प्रमाणें कोणतीं आहेत, तो कसा सिद्ध केला आहे, ही गोष्ट नैयायिकांना अधिक महत्वाची वाटते. सर्व दर्शनकारांनी न्यायदर्शनाची पद्धति, प्रक्रिया आत्मसात केली आहे. आद्य शंकराचार्य, सुरेश्वर, मधुसूदन, प्रकाशानंद, चित्सुखाचार्य यांच्या सारख्या वेदान्तदार्शनिकांनी आपले सर्व सिद्धान्त न्यायघटित पद्धतीनें विवेचिले आहेत. भारतीय संस्कृतींत वेदान्तदर्शनाला लाधलेला स्थायीभाव न्यायघटित प्रक्रियेनें उपलब्ध केला आहे. न्यायदर्शनानें आपली प्रमाणपद्धति प्रचारून सर्व दार्शनिकांना उपकृत केले आहे.

माझ्या कल्पनेप्रमाणे चांगला एस्. एस्. सी. शिकलेला माणूसहि जर सरळ सोपे, हलके फुलके अध्यात्मिक वाङ्मय वाचीत राहिला तर तो काहीसा सुस्त, निकामी, थोडा गचाळ झाल्यामुळें नंतर तो धृत्युत्साहसमन्वित रहात नाही. यामुळें मी माझ्या दिनक्रमामध्यें अगदी ठरवून कांहीं बदल केला आहे आणि यासाठीं रोज तास, अर्धा तास असा काळ नित्यनियमानें द्यायचा असे मी ठरविले आहे. ‘‘व्याकरणीं चोखडा तर्की अतिगाढा’’ असे उपहासानें म्हटले जाते. अथवा ‘‘न हि न हि रक्षति डुकृञ् करणे।’’ नेमके हेच करण्याचे मी ठरविले

आहे. यामध्यें मराठी उच्च्य व्याकरण, लघुसिद्धान्त कौमुदी, *Western Logic* चें पुनर्अवलोकन, मेघदूत हें खंडकाव्य आणि वृत्तिप्रभाकर असे कष्टकर ग्रंथ. अशासारख्या वाङ्मयाचा कसून अभ्यास करणें आजच्या अतिवैभवशाली विज्ञान युगांत एक अपरिहार्य गरज निर्माण झाली आहे. ती टाळतां येणार नाही. 'मजूरी करूनी मिळवा भाकरी' तसे मेहनत करून ज्ञान संपादन करावे. फालतु पारमार्थिक उपक्रमांत आयुष्य व्यर्थ घालवूं नये. चैतन्यहीन गचाळ पारमार्थिक क्षेत्राचा उपसर्ग होऊं नये असे वाटत असेल तर त्यासाठीं हें कल्याणकारी भेषजच आहे. याचें सेवन करून पारमार्थिक क्षेत्रांत आरोग्यसंपन्न व्हा.'उद्याचा संसार' या अत्र्यांच्या नाटकांत त्यांतील डॉक्टरच्या तोंडीं एक वाक्य आहे—''जग बदमाश असतं पण जग खरं बोलतं'' बरेच दिवस झाले, शरद पवार एकदा म्हणाले, ''सुपर कॉम्प्युटरचे जनक विजय भटकर आतां बुवा झालेत.'' शरद पवार कुचेष्टेनें बोलले नाहीत हें तर कुणीहि ओळखूं शकेल. तेव्हां त्यांना असे कां बोलावे वाटले? कुठेतरी चुकीची दिशा आहे, चुकीची वाट आहे हे नक्की. मी शरद पवारांशीं पूर्ण सहमत आहे. मात्र मी माझ्यापुरता वठलो आहे. इतराविषयीं बोलण्याचा

मला अधिकार नाही. आणि मला त्याची आवश्यकताहि नाही. असो. वर उल्लेखित उपक्रमासाठीं रोज —अगदी रोज— कमितकमी अर्धा तास आणि जास्तीत जास्त अर्धा तासच —जास्त नाही— असा वेळ देणार आहे. पूर्ण विचारांती मी हा निर्णय घेतला आहे.१९५८ या वर्षी *Inter Arts* या कॉलेजच्या द्वितीय वर्षाला माझा *Logic* हा विषय होता, ज्याला तर्कशास्त्र म्हटले जाते. १९६० पासून मी तत्त्वज्ञान या विषयाचा अभ्यास सुरूं केला. त्याचा पाया मजबूत होण्याला मला या तर्कशास्त्राचा फार उपयोग झाला.ऐन तारूण्यांत असले शुद्ध बुद्धिप्रामाण्यवादी अनुपम शास्त्र हातीं आले; याविषयीं मी शिक्षण खात्याचा सदैव ऋणी आहे. तसेच पहिल्या वर्षी ‘मेघदूत’ हें अप्रतीम सौंदर्य काव्य होते आणि तें हि संस्कृतमध्यें, म्हणजे दुधांत साखर पडली.*S. S. C.*पर्यन्त माझी मानसिक पातळी अगदी सर्वसामान्यासारखी होती. मात्र कॉलेजच्या प्रथम आणि द्वितीय वर्षानें जाणिवेची क्षमता *Knowing Capacity* तसेच उच्यविषयासंबंधींची अभिरूची कमालीची समृद्ध आणि खऱ्याअर्थी विकसित झाली. ज्या कॉलेज जीवनानें माझा तत्त्वज्ञानाच्या प्रान्तांत अभावितपणें प्रवेश करविला त्या जीवनाशीं मी सदैव कृतज्ञ

राहिलो आहे. कॉलेजच्या त्या दोन्ही विद्या मंदिरांना त्रिवार वंदन!

ज्या वेळीं १ रूपया किलो साखर होती त्या १९५८ सालीं १० रूपयास घेतलेला तर्कशास्त्राचा मोठा ग्रंथ अजून मी व्यवस्थित ठेवला आहे. **Syllogism** चे १५१ प्रकार, त्याच्या नोट्स अजूनहि मी जपून ठेवल्या आहेत. आपल्या कडील न्याय शास्त्राच्या क्लिष्टतेप्रमाणें **Deductive Logic** हा क्लिष्ट विषय आहे.त्यामानानें **Inductive Logic** हा विषय सुलभ सोपा आहे. मात्र काय असेल ते असो **Deductive Logic** हाच विषय मला फार आवडला. येथे बुद्धीचा खरा कस लागतो. थोडे कष्ट करायची तयारी असल्यास बुद्धि तेजस्वी होते, हा माझा अनुभव आहे. .

गणितासारखे शास्त्र नाहीं.
रसोईसारखी कला नाही.
आणि वेदान्तासारखा अनुभव नाही.

पहिलें **Logic** ला लागू होते. माझे हायस्कूलमध्यें गणित आणि भूमिति हे अगदी आवडते विषय होते. भूमितीची ६५ प्रमेयें आणि १०० रायडर्स माझी सदैव तयार होती. गणितांत अंकगणित आणि बीजगणित हे दोन्हीं माझे फार जिव्हाळयाचे विषय होते. ८० पासून अगदी

९०/९५ पर्यन्त मार्क्स मला त्यावेळीं मिळत असत. सांगायचें तात्पर्य असे कीं, पहिल्यापासूनच अशा प्रकारच्या विषयांचा अभ्यास असल्यामुळें मला तर्कशास्त्र हा विषय मुळीच अवघड वाटला नाही.

कॉलेजच्या पहिल्या वर्षाला ‘मेघदूत’ या कालिदासाच्या खंडकाव्याचा मला असाच लाभ झाला. कालिदास म्हणजे मेघदूत आणि मेघदूत म्हणजे कालिदास असें समीकरणच झाले आहे. कालिदासाने नैसर्गिक काव्यशक्तीला उदंड व्यासंगाची जोड देऊन आपली अजोड काव्यसंपदा निर्माण केली आहे. शास्त्रीय आणि ललित साहित्याचा अभ्यास कालिदासाच्या ओळीओळींतून प्रतीत होतो. तात्पर्य, तत्कालीन सुसंस्कृत माणसाला आवश्यक त्या सर्व विद्या, शास्त्रें, आणि कला यांचा व्यासंग व प्रत्यक्ष ज्ञान यांच्या सहाय्यानें कालिदासाने आपली प्रतिभा संपन्न केलेली होती. कालिदासाच्या या सर्व गोष्टींचा योगायोगाने माझ्या स्वभावाशीं तंतोतंत मेळ बसतो. यामुळेंच कीं, काय, कालिदास हा माझा फार आवडता कवि आहे.

# भारतीय तर्कशास्त्र
# न्यायदर्शन

गौतमाच्या न्याय सूत्रावर प्रथम वात्स्यायनाने‘‘भाष्य’ लिहिलें.त्यावर उद्योतकाराने‘‘भाष्य वार्तिक’’लिहिलें. नंतर वाचस्पति मिश्राने‘‘वार्तिक तात्पर्य टीका’’ लिहिली. पुनः उदयनाचार्याने‘‘वार्तिक तात्पर्य टीका परिशुद्धि’’ लिहिली. तदुत्तर परिशुद्धीवर वर्धमानाने ‘‘न्याय निबंध प्रकाश’’ लिहिला. पुढे प्रकाशावर ‘‘वर्धमानेन्दु’’ ही टीका पद्मनाभ मिश्राने लिहिली. त्यावर ‘‘न्याय तात्पर्य मंडळ’’ हें भाष्य शंकर मिश्राने लिहिलें. प्रत्येक टीकेवर प्रतिपक्षियाकडून आक्षेप उत्पन्न होत व त्या आक्षेपांचें निरसन करण्याकरिता पुनः एकादा सांप्रदायिक मूळ टीकेचा अभिप्राय विशद करण्याकरिता नवीन भाष्य लिही. वात्स्यायन भाष्याच्या दिङ्नाग नामक बौद्ध तार्किकाने चिंधडया उडविल्या आणि दिङ्नागाला प्रत्युत्तर म्हणून उद्योतकारांनी आपले ‘‘भाष्य वार्तिक’’ लिहिले. प्रत्येक दर्शनाला संपन्न प्रतिभेचे असे उदंड भाष्यकार लाभले. इसवी सन पूर्व ५०० ते इसवी सनानंतर ७०० म्हणजे १२०० वर्षांचा

कालखंड सूत्रवाङ्मयाने आणि टीकाग्रंथांनी समृद्ध आहे. १७ व्या शतकापर्यन्त ही दर्शन मंदाकिनी अव्याहत अनिरूद्ध प्रवाहाने वहात आली आहे.

आतां या न्याय दर्शनाचा तपशीलांतील विस्तार पहा. कोणत्याहि विषयाशी जितका परिचय अधिक तितके त्याचे महत्व कमी भासावे हा मानवी स्वभावच आहे. प्रकाश,हवा,पाणी यांचा जीवनाशी किती निगडित संबंध आहे. मानवी व्यवहाराशीं भाषेचा संबंधहि याच प्रकारचा आहे. भाषेच्या उन्नतीकडे सामान्य मनुष्याचें लक्ष जात नाहीं. याचें कारण तिचें महत्व त्यास कळलेलें नसतें हेच होय. भाषेपेक्षांहि अत्यन्त महत्वाची वस्तूं म्हणजे ज्ञान. पंचेंद्रियास प्रतिक्षण याप्रमाणे १२ महिनेअठरा काळ होणारें ज्ञान. भाषेशिवाय सबंध दिवस जाऊ शकेल पण ज्ञानाशिवाय एक पळहि, एक क्षणहि जाणे कठीण आहे. जोपर्यन्त मनुष्य जिवंत आहे तोपर्यन्त क्षणोक्षणीं त्याच्या मनांत कित्येक विचार घोळत असतात. पण या विचारांची किंवा ज्ञानाची विचक्षणा करणारे तर्कशास्त्र अभ्यासावे असे कोणाच्या लक्षांत येत नाही. ज्ञानाशी अथवा विचाराशी अतिपरिचय हेच या उपेक्षेचें कारण आहें. ज्ञानाचा खरे-खोटेपणा दाखविणारे तर्कशास्त्र जाणून न घेता, इतर कितीहि शास्त्रांचें अध्ययन

केले तरी तें व्यर्थच समजावे.या तर्कशास्त्राचें वर्णन करतांना सर्व विद्यावर पाडणारा जणूं प्रदीप, सर्व कर्मांचा उपाय, सर्व धर्मांचें आश्रयस्थान असें हें तर्कशास्त्र आहे असे न्यायभाष्यांत म्हटले आहे.

प्रदीपः सर्वविद्यानां उपायः सर्वकर्मणाम्।
आश्रयः सर्वधर्माणां विद्योद्देशे प्रकीर्तिता।।

सत्यासत्याची कसोटी दाखवून देणे हेंच या शास्त्राचें उद्दिष्ट आहे.''प्रमाणैःअर्थपरीक्षणं न्यायः'' —न्यायभाष्य. पण या नुसत्या कसोटीचा उपयोग काय? म्हणून या शास्त्रावर प्रथम प्रथम ग्रंथ होऊं शकले नाहीत.अध्यात्म विद्येवर प्राचीन काळापासून अनेक ग्रंथ झालेले आहेत.प्रत्येक ग्रंथकाराने अथवा दर्शनकाराने आपापली तर्कपद्धति स्वीकारली आहे. या सर्वग्रन्थांत आणि दर्शनांत सत्यज्ञानाची साधने कोणती या प्रश्नाचाहि विचार केलेला असतो पण तो प्रामुख्याने नव्हें, आनुशंगिक म्हणून असतो. प्रमाणांचा प्रामुख्याने विचार करणारे दर्शन 'न्यायदर्शन' हेंच आहे. दर्शन शब्दाची व्याप्ती विचारांत घेतली तर न्यायदर्शन एक दर्शन आहे. त्यामुळें ***Western Logic*** शीं या शास्त्राची एकरूपता नाही हे ध्यानीं येते.म्हणून त्या दृष्टिकोनांतून पाहणें म्हणजे भारतीय न्यायशास्त्र अनेक विषयांचा गोंधळ आहे असेच वाटण्याचा संभव आहे. भारतीय

तर्कशास्त्र हें सर्वप्रकारच्या ज्ञानसाधनांचा साकल्याने विचार करणारे असल्यामुळें केवळ अनुमान विचारांत गर्क असणाऱ्या ***Logic***शीं तें एकरूप नाही. न्यायशास्त्रांत सर्व ज्ञानसाधनें, आत्मा, पुनर्जन्म इत्यादि प्रमेये आणि वादविद्या असे तीन विषय प्रामुख्याने येतात.

मागे न्यायदर्शनाचा त्रोटक इतिहास दिला. आतां तो तपशीलांत देतो. न्यायशास्त्रावरील सर्वात प्राचीन ग्रंथ गौतमाची न्याय सूत्रें हाच होय. मात्र महर्षि गौतम हा त्याचा आद्य प्रवर्तक ठरत नाही. त्याच्याच ग्रंथावरून त्याच्यापूर्वी कित्येक शतकें हें शास्त्र परिणत होतें असें दिसून येतें. छान्दोग्य उपनिषदांत ७; १,२. ‘वाकोवाक्यम्’ असे एका शास्त्राचें नांव आलेले असून आचार्यांनी त्याचा अर्थ“तर्कशास्त्रम्”असा केलेला आहे.या शब्दापेक्षाहि “आन्विक्षिकी” या शब्दाचा प्रयोग मात्र विपुल आढळून येतो. न्याय सूत्रावरील वात्स्यायनकृत भाष्यांत या दर्शनास आन्विक्षिकी असे स्पष्टपणे म्हटले आहे.प्रत्यक्ष व आगम यांच्या सहाय्याने ज्ञान झाल्यावर त्या ज्ञानाची विचक्षणा कशी करावी हें सांगणारे शास्त्र ती आन्विक्षिकी होय असे म्हणून या शब्दाची व्युत्पत्तिहि तेथे दिली आहे. कौटिल्यीय अर्थशास्त्रांतहि ‘आन्विक्षिकी’ असाच शब्द या

शास्त्राला वापरला आहे. म्हणून गौतमापूर्वी ‘वाकोवाक्यम्’ किंवा ‘आन्विक्षिकी’ या नांवाने हें शास्त्र प्रचलित होतें असे मानावयास जागा आहे. भारतीय विद्या व यज्ञ यांचा संबंध प्रसिद्धच आहे. ज्योतिष, भूमिति, संगीत यांची वाढहि यज्ञसंस्थेच्या आधारानेच झाली होती. प्रस्तुत तर्कशास्त्राचें मूळहि यज्ञसंस्थेंतच सापडतें. यज्ञाच्यावेळीं सदस्य व प्रेक्षक यांनी उपस्थित केलेल्या प्रश्नांचें उत्तर देण्यासाठीं असलेला ‘ब्रह्मा’ नांवाचा ‘ऋत्विज’ स्वाभाविकच तर्कशास्त्राचा अवलंब करीत असे. या दृष्टीने आज जे ब्राह्मण नांवाचे ग्रंथ उपलब्ध आहेत, त्यांचे निरीक्षण केल्यास त्यांत त्या वेळेच्या ब्रह्मा नांवाच्या ऋत्विजाने केलेल्या कोटीक्रमाचा संग्रह दिसून येईल पूर्वमीमांसेची प्रणाली तर्कशास्त्रानंतरची आहे,म्हणजे तर्कशास्त्रीय परंपरेच्या नंतरची आहे.पूर्वमीमांसा ज्या प्रकारचे कोटीक्रम करते तसले कोटीक्रम वेदग्रन्थांत फारसे आढळत नाहीत.मात्र नैयायिक थाटाचे कोटी-क्रम जागोजाग आढळतात.ब्राह्मण ग्रंथानंतर तैत्तिरीय आरण्यकांत प्रत्यक्ष व अनुमान या दोन प्रमाणांचा उल्लेख सापडतो. ‘‘श्रुतिः प्रत्यक्षं ऐतिह्य अनुमान चतुष्टयम्।’’ तैत्ति. आरण्यक १; २.रामायण आणि महाभारत या ग्रंथात ‘‘हेतुविद्या’’असा या शास्त्राचा वाचक शब्द प्रामुख्याने दिसून येतो.

‘‘न्याय सूत्रें’’ ग्रंथाचा कर्ता अनेक नांवांनी प्रसिद्ध आहे.गौतम, अक्षपाद, अक्षचरण वगैरे. न्याय सूत्रांचा काळ कोणालाहि निश्चित ठरविता आला नाही. या सूत्रावर वात्स्यायनाचें विस्तृत भाष्य आहे. मूळ सूत्रांतील विषय या भाष्यांत चांगलाच विशद केलेला दिसून येतो.याचा काळ इसवीसना नंतरचें ४ थे शतक असा मानण्यांत आला आहे. या भाष्यानंतर उद्योत्कराचें न्यायवार्तिक पुढे आले. त्याने मूळ सूत्रें आणि वात्स्यायनाचें भाष्य या दोन्हींचा योग्य परामर्ष घेऊन न्यायशास्त्रीय विवेचनांत चांगलीच भर घातली आहे.बौद्ध व जैन ग्रंथकारांनी घेतलेल्या आक्षेपांच्या निरसनार्थ हें वार्तिक लिहिले गेले आहे. याचा काल इसवीसन ६३५ असा आहे. उद्योत्कारानंतर दोन शतकांनी इसवीसन ८४१, वाचस्पतिमिश्र पुढे आले. त्यांनी न्यायवार्तिकावर ‘‘तात्पर्यटीका’’ या नांवाची उत्कृष्ट टीका लिहिली आहे.त्यांनी‘‘न्यायसूचिनिबंध’’नांवाचा ग्रंथ लिहून मूळ सूत्रांचा शुद्ध पाठ आणि त्याची अवान्तर प्रकरणें स्पष्ट करून दाखविली. या ग्रंथाच्या शेवटीं‘‘कुनिबंधरूप चिखलांत रूतलेली न्यायसूत्रें मी वर काढीत आहे.’’असे त्यांनी स्वत:च म्हटले आहे. यावरून न्यायदर्शनाच्या खऱ्या परंपरेचा त्यावेळीं किती लोप झाला होता ते

दिसून येते. यानंतर जयन्तभट्टाने मूळ सूत्रावर ''न्यायमंजिरी'' नांवाची टीका लिहिली. याला 'वृत्ति' म्हणतां येणार नाही. तिचे महत्व व विस्तार ध्यानीं घेऊन त्यास भाष्य असेच नांव द्यावे लागेल. जसन्तभट्टाने या ग्रन्थांत केवळ त्या काळापर्यन्तच्या न्यायदर्शनावरील ग्रंथकारांच्या मतांचाच नव्हें,तर वेदान्त, सांख्य, जैन, बौद्ध, मीमांसा इत्यादि इतर शास्त्रांतील मतमतांतराचाहि भरपूर उहापोह केला आहे. अशा अनेक क्लिष्ट विषयावर चर्चा करणारा ग्रंथ वाङ्मयदृष्ट्या विनोदपूर्ण व मनोरंजक लिहिला गेल्यामुळें दुधांत साखर पडावी त्याप्रमाणें झाले आहे.ज्यास भारतीय तत्त्वज्ञानाची लांबी,रूदी,खोली एकाच ग्रन्थांत पहायची असेल त्याने हा ग्रंथ अवश्य पहावा. जयन्तभट्टानंतर सुमारे शंभर वर्षांनी उदयनाचार्य इसवी सन ९८४ मध्यें उदयास आला. त्याने वाचस्पति मिश्राच्या तात्पर्य टीकेवर स्वतःची विस्तृत टीका तर लिहिलीच आहे पण याशिवाय त्याचे स्वतंत्र ग्रंथहि प्रसिद्ध आहेत.न्यायकुसुमाञ्जलि आणि''बौद्ध धिक्कार'' हे त्याचे दोन्हीं ग्रंथ आजहि विद्वत्वर्गांत विद्वत्तेचे द्योतक म्हणून समजले जातात. बौध्दमतानुयायाशीं कठोर व तर्ककर्कश वाग्युध्दें खेळण्यांत तो पटाईत होता. पुरीच्या जगन्नाथाविषयीच्या आख्यायिकेंत तो म्हणतो,''जर

पुन्हा बौद्धांचा हल्ला झाला तर तुझे जीवन माझ्या हातात आहे.’’ऐश्वर्यमदमत्तोऽसि मामवज्ञाय वर्तसे।

संप्राप्ते तु पुनर्बौद्धे मदधीना तव स्थितिः।।

यावरून निरीश्वरवाद खंडनार्थ उदयनाने केलेले प्रयत्न किती निकराचे होते हे कळून आल्यावाचून रहात नाही. उदयनानंतर वर्धमानोपाध्याय, भासर्वज्ञ रूचिदत्तमिश्र,वल्लभ इत्यादि ग्रंथकार निर्माण झाले. इसवी सनाच्या १२ व्या शतकाच्या शेवटी शेवटी मात्र न्यायशास्त्रीय ग्रंथरचना पद्धतींत क्रान्ति दिसून येऊं लागली. या क्रान्तीचा पाया गंगेशोपाध्यायाने घातला. मूळ न्यायसूत्रांत दिलेल्या आत्मा, पुनर्जन्म, तत्त्वज्ञान, मोक्ष इत्यादि अध्यात्मविषयक प्रमेयांचा विचार, वादविद्येतील अवान्तर नियम यास गंगेशाने आपल्या ग्रंथांत फारसे स्थान दिले नाही. गंगेशाच्या या प्रयत्नामुळें भारतीय तर्कशास्त्राचें सुस्पष्ट वेगळे रूप दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें.गंगेशाने प्रमाण विचार व प्रमेय विचार यांचा वेगळेपणा स्पष्ट करून एक प्रकारे भारतीय तर्कशास्त्रास उज्वल स्वरूप प्राप्त करून दिले यांत शंका नाही. इसवी सनाच्या १५ व्या शतकाच्या मध्यापर्यन्त या ग्रंथाचें वर्चस्व मिथिलेतील सर्व पंडितवर्गावर बसून गेले. हा सर्वश्रेष्ठ ग्रंथ मैथिल पंडित मिथिलेबाहेर जाऊं देत नव्हते. परंतु वासुदेव सार्वभौमाने मोठ्या कष्टाने तो

वंगप्रदेशांतील नवद्वीप नांवाच्या प्रांतात आणला. नवद्वीपांत याच वासुदेवाने विद्यापीठ स्थापून त्यांत या ग्रंथाचें अध्यापनहि सुरूं केलें.या वासुदेवाचे दोन प्रख्यात शिष्य झाले. एक रघुनाथ तार्किक शिरोमणी असून दुसरा बंगालमधील वैष्णव संप्रदायाचा संस्थापक चैतन्य महाप्रभू हा होय. मिथिलेप्रमाणे बंगाालमध्येंहि हा ग्रंथ विद्वन्मान्य झाला. त्यानंतर त्याचा मद्रास, महाराष्ट्र, काश्मीर इत्यादि लांबलांबच्या प्रान्तांतहि प्रसार झाला. गेल्या पांचशें वर्षांतील संस्कृत ग्रंथ पाहिले तर प्रत्येक शास्त्रावर या ग्रंथाचा परिणाम असल्याचे दिसून येईल. यामुळेंच या ग्रंथावर टीका उपटीकाहि फार झालेल्या आहेत. मूळ ग्रंथ सुमारे ३०० पानांचा असला तरी त्याच्यावरील टीकांची पानें मोजल्यास ती एक लाख भरतील असे एका आधुनिक तज्ञाचें म्हणणें आहें. या ग्रंथातील विधान अत्यंत काटेकोर भाषेंत केलेलें असून प्रत्येक कल्पनेचा शक्य तितका बारीक कीस काढला आहे. गंगेशाचा हा 'तत्त्वचिंतामणि' ग्रंथ न्यायशास्त्रीय इतिहासांतहि क्रान्तिकारक ठरला. ती क्रान्ति म्हणजे या ग्रंथाच्या प्रभावापुढें प्राचीन सूत्र भाष्यांचे तेज फिके पडून त्यांचे अध्ययन अध्यापन बंद पडूं लागलें. यामुळें गंगेशाच्या प्रथेंतील विवेचनास व ग्रंथास

‘‘नव्यन्याय’’ असे नांव पडलें. गंगेशोपाध्यायानंतर नव्यन्यायांत विशेष प्रभावशाली ठरलेली व्यक्ति म्हणजे रघुनाथ तार्किक शिरोमणि ही होय. नवद्वीप विद्यापीठांत वासुदेव सार्वभौमाजवळ याने मूळ अभ्यास केला. त्यानंतर त्याने मिथिला विद्यापीठांत जाऊन तेथील वृद्ध नैयायिक पक्षधर मिश्राचा पराभव करून स्वत:च्या बुद्धीचें वर्चस्व स्थापित केलें. यापुढे लोक न्यायविद्येसाठीं मिथिलेपेक्षां बंगालकडेच पाहूं लागले. त्याने तत्त्वचिंतामणीवर दधिति—तिचेच दुसरें नांव शिरोमणि—ही टीका लिहिली. जेथे तत्त्वदृष्ट्या परंपरा चूक दिसली तेथे त्याने नव मत पुरस्कारले आहे. त्याने परंपरेचे नसते स्तोम माजविले नाही. ‘‘निर्युक्तिकस्तु प्रवादो न श्रद्धेय:’’म्हणजे युक्तिरहित नुसत्या प्रवादावर श्रद्धा ठेवूं नये. असे एक महत्वपूर्ण वाक्य त्याच्या ग्रन्थांत आढळतें. वैशेषिकांच्या पदार्थ विभागणीची आमूलाग्र पुनर्घटना करणारा पदार्थ खंडन नांवाचा स्वतंत्र ग्रंथहि याने लिहिला आहे. न्यायशास्त्राच्या इतिहासांत रघुनाथ तार्किक शिरोमणीचें नांव वैशिष्ठयाने चमकून दिसतें. कारण नव विचारांची निर्मिती या ग्रंथकाराबरोबरच नष्ट झाली. यानंतर पुढील काळांतील ग्रंथकारास आणि विद्वानास नवीन पदार्थ शोधनापेक्षां त्याच्या मांडणींतील

काटेकोरपणाचेंच महत्व वाटूं लागलें होतें. या प्रथेचा विकास गधाधराने केला असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. या गदाधर अथवा गदाधर भट्टाचार्यानंतर न्यायदर्शनाची वाढ मुळीच झाली नाही असे म्हटले तरी चालेल. गदाधराने पांडित्याच्या अभिरूचीस जें वळण दिलें त्यामुळें मूळ 'चिंतामणि' आणि 'शिरोमणि' या ग्रन्थांचें अध्ययनहि संपुष्टांत आलें. आज भारतीय पंडित वर्गामध्यें चिंतामणीवरील टीकांचा अभ्यास प्रचलित असला तरी 'मूळ चिंतामणि' अभ्यासलेला एकहि पंडित उपलब्ध नाही. तसेच या क्रान्तिकारक मूळ ग्रंथाचें कोणत्याहि भाषेंत भाषांतर उपलब्ध होत नाही.या सर्व दुरवस्थेचें मूळ जगदीश आणि गदाध-रांनी आपल्या शाब्दिक अवडंबरामुळें रोवले. न्याय शास्त्रावरील ग्रंथकारांचा गदाधराबरोबरच शेवट झाला असे म्हटल्यास फारसे बिघडणार नाही. गदाधरानंतर फारसे ग्रंथकार या शास्त्रांत प्रसिद्धीस आले नाहीत. कांहीं किरकोळ ग्रंथकार अगदी सामान्य अभ्यासकासाठीं निर्माण झाले.न्यायपंचानन इसवी सन १६३४ आणि अन्नंभट्ट इसवी सन १६२३ हे दोनच ग्रंथकार झाले.विश्वनाथ पंचाननाने 'भाषापरिच्छेद' लिहून त्यावर त्याने स्वत:च'सिद्धांत मुक्तावलि' नांवाची टीका लिहिली आहे. अन्नंभट्टाने

‘तर्कसंग्रह’ नांवाचा बालबोध प्राथमिक ग्रंथ लिहून त्यावर त्याने स्वतःच ‘दीपिका’ नांवाची टीका लिहिली आहे.

“न्यायशास्त्रीय विषयांचा आणि कल्पनांचा विकास”या दिशेने विद्वानांनी अद्याप फारसा प्रयत्न केलेला नाही. ही एक मोठी उणीव राहून गेली आहे.

आप्पा ठोंबरे.

दिनांक : — २३/५/२००७